केंद्र पुरस्कृत समग्र शिक्षा योजनेअंतर्गत सर्वसाधारण घटकांतर्गत ४ थ्या हप्त्याचा निधी शिक्षक शिक्षण कार्यक्रमाखाली DIET AS CENTRE OF EXCELLENCE अंतर्गत राज्यातील धाराशिव, नंदुरबार, अमरावती, नांदेड, वाशिम व वर्धा या जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्थांच्या सक्षमीकरणाकरिता वितरीत करणेबाबत..... (केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा)

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः- पूरक-२०२४/प्र.क्र.१२/प्रशिक्षण**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा चौक, मंत्रालय, मुंबई ४०००३२

दिनांक :- ३० मार्च, २०२४.

**संदर्भ :-**

१) केंद्र शासन, शालेय शिक्षा व साक्षरता विभाग, शिक्षा मंत्रालय, नवी दिल्ली यांचे कार्या. आदेश क्र. F.No-१-९/२०२३-IS.२०(pt.), दि.१५.१२.२०२३, शुद्धीपत्रक दि. ०५.०१.२०२४, परिशिष्ट दि. ०५.०१.२०२४, दि. १३.०३.२०२४

२) भारत निर्वाचन आयोग सचिवालय यांचे पत्र क्र. ४३७/INST/ECI/FUNCT/MCC/२०२४ (MCC ENFORCEMENT), दि. ०२.०१.२०२४

३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र. ४०/अर्थ-३, दि. १२.०४.२०२३

४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण १०१८/प्र.क्र. ४६/अर्थोपाय, दि. ०५.१२.२०२३

५) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. ०८.१२.२०२३

६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र. ४०/अर्थ-३, दि. ०४.०३.२०२४

७) केंद्र शासन, शालेय शिक्षा व साक्षरता विभाग, शिक्षा मंत्रालय, नवी दिल्ली यांचे आदेश क्र. F.No-७-२/२०२३-IS-१(GEN), दि.२९.०३.२०२४.

८) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचे दि. ३०.०३.२०२४ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय शैक्षणिक धोरण (NEP)-२०२० नुसार जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्थांना (DIETs) Vibrant Institutions of Excellence म्हणून विकसित करण्याच्या अनुषंगाने DIETs as Centre of Excellence ही संकल्पना विकसित करण्यात आली असून, त्यान्वये देशातील सर्व कार्यरत DIETs चे अद्ययावत ICT आणि तंत्रज्ञान सुविधांनी पूर्णतः सुसज्ज, सुधारित आणि आधुनिक पायाभूत सुविधांसह परिपुर्ण CENTRES OF

EXCELLENCE मध्ये रुपांतर करण्यात येणार आहे. त्याकरिता समग्र शिक्षा या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत पुढील पाच आर्थिक वर्षांसाठी प्रत्येक वर्षी पुर्वनिर्धारित कोटयानूसार DIETS ना श्रेणीसुधारित करण्यासाठी राज्ये/केंद्रशासित प्रदेशांना केंद्र शासनाकडून समग्र शिक्षा नियमांनुसार आर्थिक सहाय्य प्रदान केले जाणार आहे. यासाठी केंद्र व राज्य हिस्सा प्रमाण अनुक्रमे ६० : ४० असे आहे. त्यानूसार सन २०२३-२४ या चालू आर्थिक वर्षामध्ये राज्यातील धाराशिव, नंदुरबार, अमरावती, नांदेड, वाशिम व वर्धा या जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था DIET AS CENTRE OF EXCELLENCE म्हणून रुपांतरित करण्याकरिता केंद्र शासनाच्या DIET AS CENTRE OF EXCELLENCE प्रकल्प मान्यता मंडळाने (PAB) संदर्भ क्र. १ येथील पत्रांमध्ये नमूदनूसार रक्कम मंजूर केली आहे

२. उक्त प्रयोजनाकरिता केंद्र शासनाने दि. २९ मार्च, २०२४ रोजीच्या निधी वितरण आदेशान्वये सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील ४ थ्या हप्त्याचा केंद्र हिस्स्याचा अनावर्ती निधी उपलब्ध करुन दिला असून, वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने केंद्र हिस्सा निधी राज्य शासनाच्या एकत्रित निधीत जमा झाल्याबाबत दि. ३०.०३.२०२४ रोजी ई-मेलद्वारे कळविले आहे. त्यानूसार सदर केंद्र हिस्स्याचा निधी व त्यास समरूप राज्य हिस्सा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

समग्र शिक्षा योजनेअंतर्गत शिक्षक शिक्षण कार्यक्रमाखाली DIET AS CENTRE OF EXCELLENCE अंतर्गत राज्यातील धाराशिव, नंदुरबार, अमरावती, नांदेड, वाशिम व वर्धा या जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्थांच्या सक्षमीकरणाकरिता केंद्र शासनाने सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता सर्वसाधारण घटकांतर्गत उपलब्ध करून दिलेला केंद्र हिस्स्याचा रु. २३,९७,२५,०००/- इतका अनावर्ती निधी व त्यास समरुप राज्य हिस्स्याचा रु. १५,९८,१६,०००/- इतका निधी असा एकूण रु. ३९,९५,४१,०००/- (अक्षरी रुपये एकोणचाळीस कोटी पंच्याण्णव लक्ष एकेचाळीस हजार फक्त) इतका निधी राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. समग्र शिक्षा योजनेअंतर्गत शिक्षक शिक्षण कार्यक्रमाखाली DIET AS CENTRE OF EXCELLENCE अंतर्गत राज्यातील धाराशिव, नंदुरबार, अमरावती, नांदेड, वाशिम व वर्धा या जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्थांच्या सक्षमीकरणाकरिता वितरीत करावयाच्या केंद्र व राज्य हिस्स्याच्या तरतूदीचा

लेखाशीर्षनिहाय तपशील पुढीलप्रमाणे आहे:-

**(रक्कम रुपये)**

| **योजनेचे नाव** | **निधी हिस्सा** | **लेखाशीर्ष** | **सन २०२३-२४ सुधारित अंदाज** | **शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेला निधी** |
|---|---|---|---|---|
| समग्र शिक्षा अभियानांतर्गत DIET AS CENTRE OF EXCELLENCE अंतर्गत राज्यातील जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्थांचे सक्षमीकरण | केंद्र हिस्सा ६० टक्के | मागणी क्रमांक ई-०२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, १०६ शिक्षक व इतर सेवा, (००) (०२) समग्र शिक्षा अभियान (सर्वसाधारण) (केंद्र हिस्सा ६० टक्के) (कार्यक्रम) २२०२ आय ६२१ २७, लहान बांधकामे | २३,९७,२५,००० | २३,९७,२५,००० |
| | राज्य हिस्सा ४० टक्के | मागणी क्रमांक ई-०२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, १०६- शिक्षक आणि इतर सेवा, (००) (००) (०१) समग्र शिक्षा अभियान (सर्वसाधारण) (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम) २२०२ आय ६१२ २७, लहान बांधकामे | १५,९८,१६,००० | १५,९८,१६,००० |
| | | | **एकूण वितरीत निधी** | **३९,९५,४१,०००** |

**३.** सदर शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी केंद्र शासनाच्या DIET AS CENTRE OF EXCELLENCE च्या वार्षिक कार्ययोजना व अंदाजपत्रक प्रकल्प मान्यता मंडळाने (PAB) सन २०२३-२४ मध्ये मंजूर केलेल्या उपक्रमांसाठीच खर्च करण्यात यावा.

४. उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदींतून झालेल्या खर्चाचा लेखाशीर्षनिहाय/उपलेखाशीर्षनिहाय अहवाल तसेच निधी उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

५. DIET AS CENTRE OF EXCELLENCE अंतर्गत राज्यातील जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्थांच्या सक्षमीकरणांतर्गत सर्व खर्च हा Single Nodal Account (SNA) मधून करण्यात यावा. सदर खर्च करताना वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या निर्देशांचे तसेच वित्त विभाग, शासन परिपत्रक दि.१२.०४.२०२३ व दि.०८.१२.२०२३ मधील सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

६. भारत निर्वाचन आयोग सचिवालय यांचे पत्र क्र. ४३७/INST/ECI/FUNCT/MCC/२०२४ (MCC ENFORCEMENT), दि. ०२.०१.२०२४ मधील सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

७. सदर निधी आहरीत करून वितरीत करण्यासाठी अवर सचिव/कक्ष अधिकारी (लेखा/रोखशाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तर सह/उपसचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०३३०१५५१४१०७२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने,

TIKARAM WAMAN KARPATE

Digitally signed by TIKARAM WAMAN KARPATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=340ec5e34f4f31b01be0869a230e89b14739b1c38b24cff0edd0f8088e0c342a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9395C596B57A69FE04109B8C8191E7389CFF5EDA3FAC16C6F8263BE7FBBD319D, cn=TIKARAM WAMAN KARPATE
Date: 2024.03.30 16:09:32 +05'30'

**( टि.वा.करपते )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई

२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई

३. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

४. मा. अध्यक्ष, विधानसभा, विधान भवन, मुंबई.

५. मा. उपाध्यक्ष, विधानसभा, विधान भवन, मुंबई.

६. मा. उपसभापती,विधान परिषद, विधान भवन, मुंबई.

७. मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

८. प्रधान सचिव, (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

९. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.

१०. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई

११. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य, पुणे

१२. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर

१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर

१४. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई

१५. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई

१६. सह/उपसचिव (प्रशासन/एसडी), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई

१७. प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था, धाराशिव/नंदुरबार/अमरावती/नांदेड/वाशिम/वर्धा

१८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, धाराशिव/नंदुरबार/अमरावती/नांदेड/वाशिम/वर्धा

१९. जिल्हा कोषागार अधिकारी, धाराशिव/नंदुरबार/अमरावती/नांदेड/वाशिम/वर्धा

२०. शिक्षणाधिकारी (माध्यमिक/उच्च माध्यमिक) धाराशिव/नंदुरबार/अमरावती/नांदेड/वाशिम/वर्धा

२१. शिक्षणाधिकारी (प्राथमिक) धाराशिव/नंदुरबार/अमरावती/नांदेड/वाशिम/वर्धा

२२. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

२३. वित्त विभाग, (व्यय-५/अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई

२४. अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.

२५. अवर सचिव/कक्ष अधिकारी, रोख शाखा/एसडी-१, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई

२६. निवड नस्ती, प्रशिक्षण